राज्यात टंचाई निवारणाच्या कामांच्या संनियंत्रणासाठी मंत्रिमंडळ उप समिती गठीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- टंचाई - २०१४/ प्र.क्र.२३३/म-७**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.**
**दिनांक :- २७ नोव्हेंबर, २०१४.**

**पहा :-** १) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक :- एससीवाय- ११०९/प्र.क्र.६३/म-७, दिनांक:- ६/५/२०१०.

२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक:-सीएलएस-२०१०/प्र.क्र.४४८/म-३, दिनांक:- २ डिसेंबर,२०१०.

३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक :- टंचाई २०११/ प्र.क्र.२०२/म-७, दिनांक:- ६ सप्टेंबर, २०११.

**प्रस्तावना :-**

राज्यात सन २०१४ मध्ये मान्सूनचे उशीरा आगमन होऊन पर्जन्याचे प्रमाण काही भागात कमी झाल्याने टंचाई परिस्थिती निर्माण झालेली आहे. टंचाई परिस्थितीमुळे शेत पिकांच्या /फळबागांच्या अत्यल्प उत्पन्नामुळे त्यावर उपाययोजना सुचविण्यासाठी/ संनियंत्रण ठेवण्यासाठी मंत्रिमंडळाची उप समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यात सन २०१४ मध्ये मान्सूनचे उशीरा आगमन व कमी प्रमाणातील पर्जन्यमानामुळे निर्माण झालेल्या टंचाई परिस्थितीवर शासनाला उपाययोजना सुचविण्यासाठी व संनियंत्रण ठेवण्यासाठी या पूर्वीचे सर्व शासन निर्णय अधिक्रमीत करून खालीलप्रमाणे मंत्रिमंडळ उप समिती गठीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | मा.मंत्री (मदत व पुनर्वसन) | अध्यक्ष |
| २ | मा.मंत्री (वित्त ) | सदस्य |
| ३ | मा.मंत्री (सहकार) | सदस्य |
| ४ | मा.मंत्री (ग्राम विकास व जलसंधारण) | सदस्य |
| ५ | अप्पर मुख्य सचिव (कृषि) | निमंत्रित |
| ६ | अप्पर मुख्य सचिव (वित्त) | निमंत्रित |
| ७ | प्रधान सचिव (महसूल) | निमंत्रित |
| ८ | प्रधान सचिव (जलसंपदा ) | निमंत्रित |

| | | |
|---|---|---|
| ९ | प्रधान सचिव (पा.पु व स्व.वि.) | निमंत्रित |
| १० | सचिव (सहकार) | निमंत्रित |
| ११ | सचिव (रोहयो व जलसंधारण) | निमंत्रित |
| १२ | सचिव ( पदुम) | निमंत्रित |
| १३ | सचिव (मदत व पुनर्वसन) | सदस्य सचिव |

या समितीने राज्यात सन २०१४ मध्ये मान्सूनचे उशीरा आगमन झाल्याने तसेच पर्जन्याच्या कमी प्रमाणामुळे उद्भवलेल्या टंचाई परिस्थितीवर मात करण्यासाठी आवश्यक बाबींचा विचार करून त्यांच्या शिफारशी मंत्रिमंडळाला सादर कराव्यात.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४११२७१४१९५३९३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Shankarrao Bokade

Digitally signed by Suresh Shankarrao Bokade
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Suresh Shankarrao Bokade
Date: 2014.11.27 14:28:19 +05'30'

**( सुरेश शं. बोकडे )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३) मा.मंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव.
४) मा.मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव.
५) मा.मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव.
६) मा.मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव.
७) मा.मुख्य सचिव, यांचे स्वीय सहाय्यक.
८) समितीचे सर्व निमंत्रित (अ.मु.स. / प्रधान सचिव / सचिव ),यांचे स्वीय सहाय्यक.
९) कार्यासन म-३ / म-७/ म-११ महसूल व वन विभाग.